**जलसंपदा विभागांतर्गतच्या खाजगी आणि सहकारी उपसा सिंचन योजनांच्या लाभक्षेत्रातील खारवट /पाणथळ जमिनीची सुधारणा करणेसाठी उपाय योजना राबविणेबाबतचे सुधारीत धोरण...**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सिडीए २०१८/प्र.क्र. १५२/१८)/ ला (कामे)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दि. २१/०७/२०२०

<u>संदर्भ :</u>- १) जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र. डी.आर.एस.-१०७९/(२७२७)/व्यवस्था - २, दि. ०८.०७.१९८१.

२) पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालयाचे पत्र क्र.प्रशा-१/ताशा-१/धा(४०/१७)/३११७, दि.२७ ऑगस्ट २०१८

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रामध्ये काळ्या व भारी जमीनींन पुरेसा निचरा भूस्तर नसल्यास तसेच जास्त पाणी शेतात वापरल्यामुळे भूपृष्ठाखालील पाणी पृष्ठभागावर येते व त्यामुळे अशा जमिनी पाणथळ होऊन खराब होतात. जमिनीच्या वरच्या थरात क्षारांचे थर साठल्यामुळे आणि जमिनीखालील क्षार भूपृष्ठावर आल्यामुळे जमिनी खारवट होऊन खराब होतात. खराबा क्षेत्र / क्षारपड क्षेत्र निर्माण होऊ नये म्हणून प्रतिबंधात्मक योजना उदा. परंपरागत बारमाही पिकांचे धोरण बदलणे, पारंपारीक पिक पध्दतीत बदल करणे, बारमाही पिकांऐवजी फळवर्गीय हंगामी पिकांवर भर देणे, सुक्ष्म सिंचन पध्दतीचा (ठिंबक, तुषार इ. ) वापर, रासायनिक खतांचा कमी वापर करणे इक्षू मर्यादेचे पालन करणे इ. उपाययोजना खराबा क्षेत्र कमी करण्यासाठी राबविण्यात येतात.

अशा खारवट व पाणथळ झालेल्या जमिनीची सुधारणा करणे आवश्यक ठरते. अन्यथा त्या अनुपजाऊ होतात व उत्पादनात घट होते.

जलसंपदा विभागाच्या मोठ्या व मध्यम प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील क्षारपड / खारवट जमिनींचे सर्वेक्षण व चर योजनांची कामे शासनाच्या निधीतून करण्यात येतात. तथापि, खाजगी व सहकारी उपसा सिंचन योजनांच्या लाभक्षेत्रातील जमिनीकरीता फक्त सर्वेक्षण शासनाच्या निधीतून करण्याचा निर्देश संदर्भिय शासन निर्णयान्वये दिले आहेत.

ही तफावत दूर करण्यासंदर्भात विविध लोकप्रतिनिधींची निवेदने, विधान मंडळात तारांकीत प्रश्न, (आश्वासने), अर्धातास चर्चा इ. उपस्थित करण्यात आले होते. वास्तविक खाजगी व सहकारी उपसा सिंचन योजना या शेतकऱ्यांनी एकत्र येऊन स्वखर्चाने उभारुन चालविण्यात येतात. त्यामुळे उपलब्ध पाण्याचा वापर होण्यास तसेच शासनाचा या कामी होणारा खर्च वाचविण्यात सहाय्य होते. राज्याच्या कृषी उत्पन्नात व सकल घरेलू उत्पन्नात (GDP) वाढ होते. अनेक योजना ३०-४० वर्षापासून कार्यरत आहेत. या योजनांच्या लाभक्षेत्रातील जमिनीचा प्रकार, निचरा होणारा भुस्तर नसणे, मातीची गुणवत्ता इ.अनेक बाबींमुळे कालांतराने जमिनी क्षारपड होण्याचे प्रमाण वाढले आहे. त्यांच्या सुधारणेसाठी शासन स्तरावरुन निधी उपलब्ध होत नसल्याने जमिन विनावापर राहतात, जलसंपत्ती

वाया जाते. पर्यायाने शेतकऱ्यांना व राज्याला मोठे आर्थिक नुकसान होते. याबाबत पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय पुणे यांनी संदर्भ-२ अन्वये प्रस्ताव सादर केला होता.

उपरोक्त परिस्थितीचा गांभीर्याने विचार करता खाजगी व सहकारी उपसा सिंचन योजनांच्या लाभक्षेत्रातील क्षारपड जमिनीची सुधारणा करणेसाठी निचरा योजना राबविणेबाबत व्यापक जनहिताचा विचार करुन धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जलसंपदा विभागांतर्गतच्या खाजगी आणि सहकारी उपसा सिंचन योजनांच्या लाभक्षेत्रातील खारवट व पाणथळ झालेल्या जमिनीची सुधारणा करणेसाठी निचरा योजनांची कामे शासनाच्या निधीतून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. क्षारपड जमिनीचे सर्वेक्षण पूर्वीप्रमाणेच शासनाच्या निधीतून करण्यात येईल. तसेच संदर्भिय शासन निर्णय दि.०८/०७/८१ अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. क्षारपड जमिनीची सुधारणा करण्यासाठी कामावर येणाऱ्या खर्चाच्या हिश्श्याची विगतवारी पुढीलप्रमाणे असेल-

८० % शासन निधी

१० % संबंधीत जमीन धारक

१० % संबंधीत साखर कारखाने, उद्योजकांचा सामाजिक दायित्व निधी,(CSR).

२.१ सर्वेक्षणानंतर तयार केलेल्या रु. ५ कोटी पर्यंतच्या अंदाजपत्रकास शासन स्तरावरुन जलसंपदा विभागस्तरावर प्रशासकीय मान्यता देण्यात येईल. अशी प्रशासकीय मान्यता देतांना अंदाजपत्रकासमवेत सहभागीता निधी देण्याबाबतची जमिन धारक व साखर कारखाने / उद्योजक यांची संमतीपत्रे जोडण्यात यावीत. तसेच सहभागीता निधी जलसंपदा विभागाकडे जमा केल्यावरच निवीदा सूचना काढण्यात यावी.

३. काम पूर्ण झाल्यावर त्याची देखभाल व दुरुस्ती संबंधीत उपसा सिंचन योजनेच्या संस्थेने करावयाची आहे.

४. सदरच्या निचरा योजनेसाठी आवश्यक जमीन लाभधारकांनी विनामोबदला उपलब्ध करुन द्यावी लागेल.

५. निचरा योजनेचा सर्वेक्षणाचा खर्च " ३३१ जल व विकास सेवा (ए) जलविकास (एफ) सर्वेक्षण व अन्वेषण (२) जलनिस्सारण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना "या लेखाशिर्षाखाली करावा.

६. निचरा योजनेतील कामासाठी शासनाच्या हिश्श्यापोटीचा खर्च " ४७११ (२७९४) (०२) जलनिस्सारण कामे (०२) (०३) बिगर लाभक्षेत्र विकास प्राधिकरणांतर्गत जलनिस्सारण प्रकल्प (कार्यक्रम) " या लेखाशिर्षाखाली करावा.

७. हा शासन निर्णय नियोजन विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. ६०/२०२०/१४३३, दि. १६/०४/२०२० व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र.८७/व्यय-१२, दि.०९/०७/२०२० ला अनुलक्षून निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००७२११७०३०८८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole Date: 2020.07.21 17:27:04 +05'30'

**(अ. अ. कपोले)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मुंबई.३२
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई ३२.
४. मा.अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई ३२.
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई ३२
७. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई ३२
८. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१०. महालेखापाल १/२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
११. प्रधान सचिव, वित्त विभाग, नियोजन विभाग, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, सहकार विभाग,कृषी विभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१४.सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी) नाशिक
१६.महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, (वाल्मी) औरंगाबाद.
१७. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१८. सर्व विभागीय आयुक्त.
१९.आयुक्त (साखर),साखर संकुल,वाकडेवाडी,पुणे
२०. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२१.सर्व जिल्हाधिकारी
२२. सर्व उपसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
२४.निवड नस्ती.